कोषागारातून रोख देय अनुदान
राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत
देखभाल व दुरूस्तीचे राज्य हिश्श्याचे अनुदान
वितरीत करण्याबाबत (२२१५ २०८२)

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१६ /प्र.क्र.६२ /पा.पु.१०

सातवा मजला, गोकूळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग,क्रॉफर्ड मार्केट जवळ, मुंबई-४०० ००१
तारीख: ३० मार्च, २०१७

**वाचा-**

**शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,ग्रापाधो-१११४ /प्र.क्र. ५२ /पापु-७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४**

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत आर्थिक वर्ष २०१६-१७ मध्ये मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(०१६) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना- देखभाल व दुरुस्ती यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ २०८२) या राज्य हिश्श्याच्या लेखाशिर्षाखाली देखभाल व दुरुस्तीसाठी अनुदान मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

आर्थिक वर्ष २०१६-१७ मध्ये ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल व दुरुस्तीकरीता लेखाशिर्ष ( २२१५ २०८२) या खाली उपलब्ध असलेला रु. ९.५७४० (रुपये नऊ कोटी व सत्तावन्न लक्ष चाळीस हजार फक्त) इतके अनुदान ग्रामीण भागातील नळ पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल व दुरूस्तीसाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे संबंधित जिल्हा परिषदा आणि महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर ( BEAMS ) मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी -**

१. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत देखभाल व दुरूस्तीच्या सन २०१६-१७ च्या निश्चित वार्षिक कृती आराखडयात उपरोक्त घटकांसाठी समाविष्ट असलेल्या गावे/वाड्यांमधील प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या गावे/वाड्यांमधील योजनांची कामे तसेच ज्या केंद्रीय साहाय्यित योजनांमध्ये शासन सहभाग

सक्तीचा करण्यात आलेला आहे ,अशा प्रगती पथावरील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथ्यम्याने खर्च करावयाचे आहे.

२. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तींची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परीक्षणाकरिता संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

३. शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. आरसीएन-१८९/सी.आर.-३०२७/२८, दि. ५/९/९० मधील सूचनेप्रमाणे सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी विभागीय आयुक्त, (विकास शाखा) यांना व कार्यासन पापु-१० /पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

४. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार देखभाल व दुरूस्ती याखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे.

५. केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता, IMIS या प्रणालीवर घेण्यात येऊन सदर नोंदी वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात.

६. सदर निधी सन २०१६-१७ या वर्षांच्या देखभाल व दुरूस्ती कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. तसेच उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी उपयोगात आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून खर्चाचे नियोजन करावे व उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळीच सादर करावीत.

७. सदर रक्कम त्वरित आहरीत करण्यात यावी.

या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधीकरण ,मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रू. ३.०३४० कोटी (रूपये तीन कोटी तीन लक्ष चाळीस हजार मात्र ) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधीकरणाचे संचालक (वित्त) (श्री. सुधाकर डांगे) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उपसचिव ,पाणी व स्वच्छता विभाग (श्री. रूचेश जयवंशी) यांनी प्रतिस्वक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय , मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक (वित्त) (श्री. सुधाकर डांगे) यांना महाराष्ट्र जीवन प्राधीकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच उपसचिव, पाणी

पुरवठा व स्वच्छता विभाग (श्री.रूचेश जयवंशी ) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधीकरण यांच्या खात्यात जमा करण्यात यावी.

यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय-०२, लेखाशीर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता ,०१,पाणी पुरवठा,१०२,ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम,(०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने,(०२)(०१६) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना- देखभाल व दुरुस्ती यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ २०८२) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक दि. २०/०४/२०१६ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.सदर प्रकरणी वित्त विभाग परिपत्रक दि. २०/०४/२०१६ मधील अनुक्रमांक ७ ते १८ येथील अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील क्र. ३ व ९ येथील बाबींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१५०३२८०२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.30 13:06:58 +05'30'

**(सु.ज.तुमराम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र- १ मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
प्र.स. (पा.पु. व स्व. वि.) यांचे स्वीय सहायक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
उपसचिव,(अर्थसंकल्प),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
वित्त विभाग(कार्यासन व्यय-०३)/नियोजन विभाग(कार्यासन -१४४३), मंत्रालय,मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा
मुख्य लेखा व वित्त अधिकारी सर्व जिल्हा परिषदा
संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर

कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, सर्व जिल्हा परिषदा
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी .
अधिदान व लेखा अधिकारी ,मुंबई.
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४, पा.पु.२०.
निवडनस्ती कार्यासन पापु-१०

**विवरणपत्र**

| शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. राग्रापे २०१६/प्र.क्र.६२ / पापु-१०, दिनांक : ३० मार्च, २०१७ चे सहपत्र | | | |
|---|---|---|---|
| ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनाच्या देखभाल व दुरूस्तीसाठी निधी वितरण (राज्य हिस्सा) (सर्वसाधारण घटक) (लेखाशिर्ष २२१५ २०८२) (रूपये लाखात) | | | |
| अ.क्र. | अंमलबजावणी यंत्रणेचे नांव | घटक | एकूण वितरीत रक्कम |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | जिल्हा परिषद, ठाणे | देखभाल व दुरूस्ती | ६.०० |
| २ | जिल्हा परिषद, रायगड | देखभाल व दुरूस्ती | १०.०० |
| ३ | जिल्हा परिषद, रत्नागिरी | देखभाल व दुरूस्ती | १४.०० |
| ४ | जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग | देखभाल व दुरूस्ती | १०.०० |
| ५ | जिल्हा परिषद, पालघर | देखभाल व दुरूस्ती | ७.०० |
| ६ | जिल्हा परिषद, पुणे | देखभाल व दुरूस्ती | १०९.०० |
| ७ | जिल्हा परिषद, सातारा | देखभाल व दुरूस्ती | २१.०० |
| ८ | जिल्हा परिषद, सांगली | देखभाल व दुरूस्ती | ५९.०० |
| ९ | जिल्हा परिषद, सोलापूर | देखभाल व दुरूस्ती | ३३.०० |
| १० | जिल्हा परिषद, कोल्हापूर | देखभाल व दुरूस्ती | ३६.०० |
| ११ | जिल्हा परिषद, नाशिक | देखभाल व दुरूस्ती | २७.०० |
| १२ | जिल्हा परिषद, जळगांव | देखभाल व दुरूस्ती | २०.०० |
| १३ | जिल्हा परिषद, अहमदनगर | देखभाल व दुरूस्ती | २८.०० |
| १४ | जिल्हा परिषद, औरंगाबाद | देखभाल व दुरूस्ती | २४.०० |
| १५ | जिल्हा परिषद,जालना | देखभाल व दुरूस्ती | २२.०० |
| १६ | जिल्हा परिषद, हिंगोली | देखभाल व दुरूस्ती | १५.०० |

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.30 13:07:45 +05'30'

**(सु.ज.तुमराम)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

| शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. राग्रापे २०१६/प्र.क्र.६२ / पापु-१०, दिनांक : ३० मार्च , २०१७ चे सहपत्र | | | |
|---|---|---|---|
| ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनाच्या देखभाल व दुरूस्तीसाठी निधी वितरण (राज्य हिस्सा) (सर्वसाधारण घटक) (लेखाशिर्ष २२१५ २०८२) (रूपये लाखात) | | | |
| अ.क्र. | अंमलबजावणी यंत्रणेचे नांव | घटक | एकूण वितरीत रक्कम |
| १७ | जिल्हा परिषद, नांदेड | देखभाल व दुरूस्ती | २६.०० |
| १८ | जिल्हा परिषद, उस्मानाबाद | देखभाल व दुरूस्ती | ११.०० |
| १९ | जिल्हा परिषद, बीड | देखभाल व दुरूस्ती | २८.०० |
| २० | जिल्हा परिषद, लातूर | देखभाल व दुरूस्ती | १८.०० |
| २१ | जिल्हा परिषद, अमरावती | देखभाल व दुरूस्ती | ९.०० |
| २२ | जिल्हा परिषद, अकोला | देखभाल व दुरूस्ती | ९.०० |
| २३ | जिल्हा परिषद, बुलडाणा | देखभाल व दुरूस्ती | २१.०० |
| २४ | जिल्हा परिषद, यवतमाळ | देखभाल व दुरूस्ती | ७.०० |
| २५ | जिल्हा परिषद, नागपूर | देखभाल व दुरूस्ती | २५.०० |
| २६ | जिल्हा परिषद, वर्धा | देखभाल व दुरूस्ती | ५.०० |
| २७ | जिल्हा परिषद, भंडारा | देखभाल व दुरूस्ती | १०.०० |
| २८ | जिल्हा परिषद,गोंदिया | देखभाल व दुरूस्ती | १३.०० |
| २९ | जिल्हा परिषद, चंद्रपूर | देखभाल व दुरूस्ती | १९.०० |
| ३० | जिल्हा परिषद, गडचिरोली | देखभाल व दुरूस्ती | १२.०० |
| ३१ | महाराष्ट्र जीवन प्राधीकरण, मुंबई | देखभाल व दुरूस्ती | ३०३.४० |
| एकूण | | | ९५७.४० |
| (रूपये नऊ कोटी सत्तावन्न लक्ष चाळीस हजार फक्त) | | | |

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.30 13:08:50 +05'30'

**(सु.ज.तुमराम)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन